**माहिती व जनसंपर्क महासंचालनालयासाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात १० छायाचित्र (स्टिल) कॅमेरे व त्यांचे सहसाहित्य तसेच एकूण १० चलचित्र (व्हिडीओ) कॅमेरे व त्यांचे सहसाहित्य खरेदीसाठी रु.१,९२,०९,३२८ इतक्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता मिळण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्र. मावज-२०२२/प्र.क्र. २३४ /कार्या-३४**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १८ जून,२०२४.

**वाचा:** १) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. मावज-२०१५/प्र.क्र.२३५/३४, दि. ०९.१०.२०१५
२) उदयोग, ऊर्जा व कामगार विभागाचा शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/ उदयोग-४, दि. २४ ऑगस्ट, २०१७
३) माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाचे पत्र क्र. वृत्तचित्र-२०२३-२४/कॅमेरा खरेदी/ का-७/१९२, दि. १३ जून, २०२३.
४) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.मावज-२०२२/प्र.क्र.२३४/कार्या-३४, दिनांक १९ डिसेंबर, २०२३.
५) माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाचे पत्र क्र.लेसाभां/२०२४/व्हिडिओ-स्टिल कॅमेरा खरेदी/ का-१/८४, दिनांक ३१ मे, २०२४

**प्रस्तावना :-**

माहिती व जनसंपर्क महासंचालनालयासाठी १० छायाचित्र (स्टिल) कॅमेरे व त्यांचे सहसाहित्य तसेच १०चलचित्र (व्हिडीओ) कॅमेरे व त्यांचे सहसाहित्य खरेदी करण्यास उक्त संदर्भ क्र.४ येथील दिनांक १९.१२.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात आली होती. तथापि, सदर खरेदी प्रक्रिया सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात होऊ शकली नसल्याचे संदर्भ क्र.५ येथील दिनांक ३१ मे, २०२४ च्या पत्रान्वये संचालक, (माहिती) (प्रशासन),माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई यांनी कळविले आहे. त्यानुषंगाने सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील मंजूर उपलब्ध तरतुदीतून भागविण्यास मंजूरी देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय : -**

उपरोक्त पार्श्वभूमी विचारात घेता माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या दिनांक ३१ मे, २०२४ च्या प्रस्तावात नमूद केल्याप्रमाणे माहिती व जनसंपर्क महासंचालनालयासाठी तसेच महासंचालनालयाच्या अधिनस्त असलेल्या विभागीय व जिल्हा माहिती कार्यालयांसाठी एकूण १० छायाचित्र (स्टिल) कॅमेरे व त्यांचे सहसाहित्य तसेच, एकूण १० चलचित्र (व्हिडीओ) कॅमेरे व त्यांचे सहसाहित्य खरेदी करण्यास व त्याकरीता येणा-या अंदाजे रु.१,९२,०९,३२८/- (रुपये एक कोटी ब्याण्णव लाख नऊ हजार तीनेश अठ्ठावीस फक्त ) इतक्या खर्चास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय आणि वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. छायाचित्र (स्टिल) व चलचित्र (व्हिडीओ) कॅमेरांचा तसेच, त्यांच्या सहसाहित्यांची संख्या व अंदाजे किंमत यांचे विवरण पुढीलप्रमाणे आहे :-

| **अ.क्र.** | **कॅमेराचा प्रकार** | **खरेदी करावयाचे नग** | **अंदाजे किंमत** |
|---|---|---|---|
| **१.** | छायाचित्र (स्टिल) कॅमेरे व सहसाहित्य | १० | रु.१,०३,८३,३४८/- |
| **२.** | चलचित्र (व्हिडीओ) कॅमेरे व सहसाहित्य | ४ | रु.४४,७५,५६०/- |
| **३.** | चलचित्र (व्हिडीओ) कॅमेरे व सहसाहित्य | ६ | रु.४३,५०,४२०/- |
| | **(एकूण किंमत अक्षरी रुपये एक कोटी ब्याण्णव लक्ष नऊ हजार तीनशे अठ्ठावीस फक्त)** | | **रु.१,९२,०९,३२८/-** |

३. सदरहू खरेदीस वित्तीय अधिकार नियमपुस्तिका-१९७८, शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२ दि. १७.०४.२०१५ मधील भाग-पहिला, उपविभाग-२, अनुक्रमांक ४, नियम क्र.७ अन्वये किरकोळ साधनसामुग्री आणि उपकरण संच विकत घेण्यास प्रशासनिक विभाग म्हणून या विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार मान्यता देण्यात येत आहे.

४. सदरची खरेदी उदयोग, ऊर्जा व कामगार विभागाचा शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/उदयोग-४, दि. २४ ऑगस्ट, २०१७ मधील तरतूदीनुसार गव्हर्नमेंट ई-मार्केट प्लेस (Gem) या पोर्टलव्दारे खरेदीच्या विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन करण्यात यावी. तथापि, माहिती व जनसंपर्क महासंचालनालयास आवश्यक असणारे नवीन कॅमेरे अत्यंत आधुनिक असल्याने, जर त्यांना आवश्यक असणाऱ्या तपशीलांचे कॅमेरे Gem पोर्टलवरुन उपलब्ध न झाल्यास प्रस्तुतची खरेदी खुल्या बाजारातून स्पर्धात्मक ई-निविदा प्रक्रियेद्वारे विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन तसेच, शासनाचे निर्णय/परिपत्रक/वित्तीय नियमावलीतील तरतूद यांचे पालन करुन करण्यात यावी.

५. वित्त विभाग शासन निर्णय क्र. डीएफपी-१०९१/प्र.क्र.४/विनियम, दि. १८ जून, १९९१ मधील तरतुदीनुसार माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाकडे सध्या असलेल्या नादुरुस्त कॅमेरांचे निर्लेखन करण्यात यावे.

६. खरेदी केलेल्या उक्त छायाचित्र व चलचित्र कॅमेरा व सहसाहित्यांची नोंद भांडार शाखेच्या जडसंग्रह नोंदवहीत घेण्यात यावी.

७. या खरेदीसाठी येणारा खर्च सामान्य प्रशासन विभाग, मागणी क्र.-ए-६-२२२०, माहिती व प्रसिध्दी, १०९, छायाचित्र सेवा (कार्यक्रम), १३-कार्यालयीन खर्च संगणक सांकेतांक (२२२० ०४१९) या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये उपलब्ध असणाऱ्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक क्र. २०२४०६१८१५१२२१२४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIJAY MAROTRAO NANDEKAR

Digitally signed by VIJAY MAROTRAO NANDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=1b335601da651693303a45db809973b127e2048acba707f3af981bf515548266, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=62861E2C588076DA807403FE9012F19FCC79CFD621047A784178829F75A0C6F2, cn=VIJAY MAROTRAO NANDEKAR
Date: 2024.06.18 15:29:31 +05'30'

**( वि. मा. नांदेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३) मा.उपमुख्यमंत्री तथा मंत्री, गृह यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
४) मा.उपमुख्यमंत्री तथा मंत्री, वित्त यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
५) मा.मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
६) मा.सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७) मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
८) मा.उपसभापती, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
९) मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१०) मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
११) सर्व मा.विधान परिषद/विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१२) अ.मु.स./प्र.स./सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३) उपसचिव, वित्त विभाग (कार्या-व्यय-४),मंत्रालय, मुंबई - ३२.
१४) उपसचिव, नियोजन विभाग (कार्या-१४४३), मंत्रालय, मुंबई-३२
१५) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
१६) उपसंचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
१७) महालेखापाल, १/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), मुंबई, नागपूर,
१८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१९) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
२०) लेखाधिकारी (आहरण व संवितरण), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
२१) निवडनस्ती (मावज-१), सामान्य प्रशासन विभाग.